**राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत एकात्मिक भरडधान्य उत्पादन कार्यक्रम सन २०११- १२ मध्ये राबविण्यासाठी वित्तीय मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- भउका- १६११/ प्र.क्र.१०१/४अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक - २४ ऑगस्ट २०११**

**संदर्भ :-** १) केंद्र शासनाचे संकेत स्थळ "www.agricoop.nic.in " वर उपलब्ध असलेल्या सदर योजनेबाबतच्या मार्गदर्शक सूचना .
२) शासन निर्णय क्रमांक :- भउका- १६११/ प्र.क्र.१०१/४अे, दि. १५ जुलै, २०११
३) शासन निर्णय क्र. राकृवि-२०११/प्र.क्र. ६३/राकृवियो, दि. ३० जुलै, २०११.

**प्रस्तावना:-**

राज्यात आतापावेतो दुर्लक्षित असलेल्या खरीप ज्वारी, बाजरी, रब्बी ज्वारी व आदिवासी क्षेत्रातील भरडधान्ये जसे बटकी, कुटकी, कोद्रा, वरई व राळा ह्या भरडधान्यांचे उत्पादन व उत्पादकता वाढावी या हेतूने केंद्र शासनाने सन २०११-१२ मध्ये **एकात्मिक भरडधान्य उत्पादन कार्यक्रम** मंजूर केला आहे. अद्यावत तंत्रज्ञानावर आधारित पीक उत्पादन प्रात्यक्षिके आयोजित करणे तसेच पीक उत्पादन मुल्यवृध्दीसाठी काढणी पश्चात तंत्रज्ञानाची सांगड घालून उत्पादकास जास्तीतजास्त शाश्वत पध्दतीने फायदा मिळवून देणे हे या योजनेचे मुख्य उद्दिष्ट आहे. सदर योजने अंतर्गत पीक प्रात्यक्षिके आयोजन करणे, बियाणे उत्पादन कार्यक्रम घेणे व मुल्यवृध्दीसाठी काढणी पश्चात तंत्रज्ञानाचा अंतर्भाव करणे इ. घटकांचा प्रामुख्याने समावेश करण्यात आला आहे. सदर योजना राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत राज्यात राबविण्यासाठी केंद्र शासनाने एकूण रू. ९१४८.०० लाख ( रू. एक्याण्णव कोटी अठ्ठेचाळीस लाख फक्त ) निधीचा कार्यक्रम मंजूर केला आहे. केंद्र शासनाने मंजूर केलेल्या रू. ९१४८.०० लाख निधीच्या कार्यक्रमास अ.क्र. ३ च्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. राकृवियो कक्षाने त्यांच्या अ.क्र. ३ च्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सदर योजनेंतर्गत रू. ४५७४.०० लाख ( रू. पंच्चेचाळीस कोटी चौऱ्याहत्तर लाख फक्त ) निधी वितरित केला आहे. राकृवियो कक्षाने वितरित केलेल्या रू ४५७४.०० लाख निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात आतापावेतो दुर्लक्षित असलेल्या खरीप ज्वारी, बाजरी, रब्बी ज्वारी व आदिवासी क्षेत्रातील भरडधान्ये जसे बटकी, कुटकी, कोद्रा, वरई व राळा ह्या भरडधान्यांचे उत्पादन व उत्पादकता वाढावी या हेतूने केंद्र शासनाने सन २०११-१२ मध्ये **एकात्मिक भरडधान्य उत्पादन कार्यक्रम** मंजूर केला असून सदर कार्यक्रम राज्यात राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत राबविण्यासाठी, राकृवियो कक्षाने रू.४५७४.०० लाख ( रू. पंच्चेचाळीस कोटी चौऱ्याहत्तर लाख फक्त ) निधी वितरित केला आहे. राकृवियो कक्षाने वितरित केलेला निधी विचारात घेऊन **एकात्मिक भरडधान्य उत्पादन**

**कार्यक्रम** राज्यात सन २०११-१२ मध्ये राबविण्यासाठी रू. ४५७४.०० लाख निधीच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजना राज्यात, केंद्र शासनाचे संकेत स्थळ "www.agricoop.nic.in " वर उपलब्ध असलेल्या सदर योजनेबाबतच्या मार्गदर्शक सुचनांनुसार राबविण्यात यावी व दि. १५ जुलै, २०११अन्वये निर्गमित केलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्रातील तपशीलाच्या आर्थिक मर्यादेत सदर योजनेची अमंलबजावणी करण्यात यावी.

३. या कार्यक्रमासाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे, तसेच मंजूर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय, पुणे** यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate)आयुक्त ( कृषि ) यांच्या स्वाक्षरीने राकृवियो कक्षास सादर करण्यात यावे.

४. **एकात्मिक भरडधान्य उत्पादन** कार्यक्रमाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाचे संकेत स्थळ "www.agricoop.nic.in " वर उपलब्ध असलेल्या सदर योजनेबाबतच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिका-यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी दि. १५ जुलै, २०११अन्वये निर्गमित केलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या शासन निर्णयातील परिच्छेद ३ मध्ये नमूद केलेल्या मुद्दा क्र. i) ते vi) मधील बाबींचा अंतर्भूत करावा.

५. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा मासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याला विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असुन त्याचा संगणक सांकेतांक २०११०९०८१२०८३५००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**सही/-**

**(वि.मा.बिवलकर)**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे.(१० प्रती)
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
विभागीय आयुक्त (सर्व),
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व).
जिल्हाधिकारी (नंदूरबार, सातारा, सांगली, बीड, उस्मानाबाद, नांदेड, परभणी, हिंगोली, यवतमाळ, वर्धा, नाशिक, अहमदनगर, पुणे, सोलापूर, चंद्रपूर, ठाणे, रायगड, रत्नागिरी व धुळे)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (नंदूरबार, सातारा, सांगली, बीड, उस्मानाबाद, नांदेड, परभणी, हिंगोली, यवतमाळ, वर्धा, नाशिक, अहमदनगर, पुणे, सोलापूर, चंद्रपूर, ठाणे, रायगड, रत्नागिरी व धुळे)

जिल्हा कोषागार अधिकारी (नंदूरबार, सातारा, सांगली, बीड, उस्मानाबाद, नांदेड, परभणी, हिंगोली, यवतमाळ, वर्धा, नाशिक, अहमदनगर, पुणे, सोलापूर, चंद्रपूर, ठाणे, रायगड, रत्नागिरी व धुळे)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (नंदूरबार, सातारा, सांगली, बीड, उस्मानाबाद, नांदेड, परभणी, हिंगोली, यवतमाळ, वर्धा, नाशिक, अहमदनगर, पुणे, सोलापूर, चंद्रपूर, ठाणे, रायगड, रत्नागिरी व धुळे)
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (नंदूरबार, सातारा, सांगली, बीड, उस्मानाबाद, नांदेड, परभणी, हिंगोली, यवतमाळ, वर्धा, नाशिक, अहमदनगर, पुणे, सोलापूर, चंद्रपूर, ठाणे, रायगड, रत्नागिरी व धुळे)
मुख्य लेखा व वित्त अधिकारी,जिल्हा परिषद ( नंदूरबार, सातारा, सांगली, बीड, उस्मानाबाद, नांदेड, परभणी, हिंगोली, यवतमाळ, वर्धा, नाशिक, अहमदनगर, पुणे, सोलापूर, चंद्रपूर, ठाणे, रायगड, रत्नागिरी व धुळे)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे दुग्ध कॉलनी ,गोरेगांव(पूर्व),मुंबई ६५.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, महाबीज भवन,कृषि नगर,अकोला.
संचालक,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,नवीन प्रशासकीय भवन,पाचवा मजला,मंत्रालयासमोर,मुंबई(२प्रतीत).
महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२,मुंबई / नागपूर.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई.
सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई ३२.
वित्त विभाग, व्यय-१, अर्थसंकल्प-१३,
सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव /कार्यासन अधिकारी, कृषि व पदुम विभाग (कृषि )
मा.मंत्री(कृषि) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव.
निवड नस्ती.